**विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्गातील उन्नत आणि प्रगत व्यक्ती/गटात मोडत नसल्याबाबतची पडताळणी करण्यासाठी उमेदवाराचे त्या वित्तीय वर्षातील नॉनक्रिमीलेअर प्रमाणपत्र गृहित धरण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७६/मावक**
मोती महल, २ रा मजला, १९५, जे.टाटा रोड, चर्चगेट, मुंबई-४०० ०२०.
दिनांक : ०९ मार्च, २०२३.

<u>वाचा :</u> (१) शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सीबीसी-२०१२/प्र.क्र.१८२/विजाभज-१, दि.२५ मार्च, २०१३.
(२) केंद्र शासन, मिनिस्ट्री ऑफ पर्सोनेल, पब्लिक ग्रिव्हन्सेस ॲण्ड पेन्शन (डिपार्टमेंट ऑफ पर्सोनेल ॲण्ड ट्रेनिंग) यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.३६०३६/२/२०१३, दि.३१ मार्च, २०१६.
(३) शासन शुध्दीपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, समक्रमांक, दि.१७ फेब्रुवारी, २०२३.

**शासन शुध्दीपत्रक**

उपरोक्त वाचा येथील अ.क्र.३ येथे नमूद शासन शुध्दीपत्रक दि.१७ फेब्रुवारी, २०२३ अधिक्रमित करण्यात येत असून सुधारित आदेश पुढील प्रमाणे आहेत.

२. शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सीबीसी-२०१२/प्र.क्र.१८२/विजाभज-१, दि.२५ मार्च, २०१३ मधील परिच्छेद-२ (ii) मधील खालील वाक्य वगळण्यात येत आहे.

"आणि सदर उमेदवार विहित केलेल्या विशिष्ट निर्णायक (crucial) तारखेस उन्नत आणि प्रगत व्यक्ति/गटात मोडत नसल्याची पडताळणी करावी."

३. शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सीबीसी-२०१२/प्र.क्र.१८२/विजाभज-१, दि.२५ मार्च, २०१३ मधील परिच्छेद-२ (iii) खालील प्रमाणे आहे.

"(iii) एखाद्या पदाकरिता अर्ज दाखल करावयाची/स्विकारण्याची अंतिम तारीख किंवा त्या पदाकरिता निश्चित करण्यात आलेली विशिष्ट निर्णायक (crucial) तारीख हीच संबंधित उमेदवार उन्नत आणि प्रगत व्यक्ती/गटात मोडत नसल्याबाबतची पडताळणी करण्यासाठी गृहित धरण्यात यावी."

उक्त परिच्छेद-२ (iii) मध्ये सुधारणा करण्यात येत असून सदरहू परिच्छेद-२ (iii) खालीलप्रमाणे वाचावा.

"(iii) संबंधित उमेदवार उन्नत आणि प्रगत व्यक्ती/गटात मोडत नसल्याबाबतची पडताळणी करण्यासाठी एखाद्या पदाकरिता अर्ज दाखल करावयाची/स्विकारण्याची अंतिम तारीख किंवा त्या पदाकरिता निश्चित करण्यात आलेली विशिष्ट निर्णायक (crucial) तारीख ज्या वित्तीय वर्षात येते, त्या वित्तीय वर्षातील उमेदवाराचे नॉनक्रिमीलेअर प्रमाणपत्र गृहित धरण्यात यावे."

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३१०१९०८५६३०३४ असा आहे. हे शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRAKASH SHRIDHAR DHAWLE

Digitally signed by PRAKASH SHRIDHAR DHAWLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BQCKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eadb2369514cf114fb080a75acc2ae8dcf8591b733bb6f63612246049721dfca, pseudonym=2BF6B5481DE84CDE63CFEFC05E5DE7C77F8FBC87, serialNumber=60C3A22DD966735D3A1B24AA927CFEE6BED87B4A378083D720DF90D57B2125D8, cn=PRAKASH SHRIDHAR DHAWLE
Date: 2023.03.10 19:15:32 +05'30'

**( प्रकाश श्री. धावले )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव.
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी).
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे)
९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. आयुक्त, समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. सर्व विभागीय आयुक्त (महसूल).
१२. सर्व जिल्हाधिकारी.
१३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१४. सर्व उपविभागीय अधिकारी (महसूल) / सर्व उप जिल्हाधिकारी (महसूल) / सर्व तहसिलदार.
१५. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण/सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण/सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी.
१६. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुशेषता) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१७. मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभाग.
१८. निवडनस्ती (मावक).

*****